महाराष्ट्र शासन

क्रमांक : मराग्र २०१०(९८/१०)साशि-५,
उच्च व तंत्रशिक्षण विभाग,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १७ मार्च २०१०

विषय : ग्रंथालय संचालनालय व सहा सहाय्यक ग्रंथालय संचालक कार्यालयांसाठी कोम्ब बाईंडिंग मशीन, २२०५ ३०५ ४ या लेखाशिर्षाखाली उपलब्ध तरतूदीतून खरेदी करण्यास मंजूरी मिळणेबाबत.

संदर्भ : १) ग्रंथालय संचालक यांचे पत्र क्र. ५५ /व्हिकॉ-बाम /२००९-१०/ १९५०१, दिनांक ११/०२/२०१०
२) सामान्य प्रशासन विभाग, शा. नि. क्र.डिआयटी/फाईल ०५/१००/३९ दिनांक २९ ऑक्टोबर २००५

**ज्ञापन :-**

संचालक, ग्रंथालय संचालनालय, यांच्या संदर्भाधीन पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन, ग्रंथालय संचालनालय व सहा सहाय्यक ग्रंथालय संचालक कार्यालयांसाठी कोम्ब बाईंडिंग मशीन, केंद्र शासनाच्या दरकरारावर असलेल्या किलबर्न ऑफीस ऑटोमेशन लिमिटेड या कंपनीकडून खरेदी करण्याकरिता, सन २००९-१० या वित्तीय वर्षात

" मागणी क्र. डब्ल्यू ४, २२०५ कला व संस्कृती,
१०५ सार्वजनिक ग्रंथालये,
(०३) मध्यवर्ती जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य
(०३)(०८) संचालक व सहा सहाय्यक ग्रंथालय संचालक कार्यालयांचे संगणकीकरण,
३१ सहाय्यक अनुदाने (२२०५ ३०५ ४) योजनांतर्गत"

यालेखाशीर्षा खाली, मासिक निधी वितरण प्रणालीनुसार उपलब्ध असलेल्या रु. ६५,००,०००/- (रु. पासष्ठ लाख फक्त) मंजूर तरतूदीतून उक्त प्रयोजनार्थ रु. १,७७,८१०/-(रु. एक लाख सत्त्याहत्तर हजार आठशे दहा फक्त) इतका खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग १, उपविभाग २ अनुक्रमांक ४५, नियम क्रमांक १६९ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार व संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये विभागास दिलेल्या अधिकारानुसार मा. प्रधान सचिव, (उवतंशि) यांच्या मान्यतेने खर्च करण्यास पूढील अटींच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे :-

अ) निधी वितरीत करताना मासिक निधी विवरणपत्रात (Cash Flow Statement) ज्या दरमहा खर्च रकमा दर्शविल्या आहेत त्याच्याशी सुसंगत असाव्यात.

ब) सदर खरेदी अस्तित्वात असलेल्या दर करार पध्दतीने करावी.

५. सदरहू ज्ञापन शासनाचे WWW.maharastra.gov.in. या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणकीय संकेतांक 201003181256270001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

( बा. ओं. हेमाडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,
ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य, नगर भवन, मुंबई २३
महालेखापाल , (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवडनस्ती साशि-५